**बोगस क्रीडा प्रमाणपत्र, बोगस क्रीडा प्रमाणपत्र पडताळणी अहवाल समर्पण योजना.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : खेआक्ष २९२२/प्र.क्र.०२/क्रीयुसे-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई -४०० ०३२
दिनांक : २३ फ़ेब्रुवारी, २०२२

वाचा- शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक- राक्रीधो २००२/प्र.क्र.६८/क्रीयुसे-२, दि.०१ जुलै,२०१६

प्रस्तावना:-

राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्पर्धांमध्ये पदके प्राप्त करणारे खेळाडू राष्ट्रास तसेच राज्यास लौकीक प्राप्त करुन देत असतात. खेळाडूंना प्राप्त होणाऱ्या संधी व शैक्षणिक अर्हता मिळविण्याचा कालावधी एकच असल्याने त्यांना दोन्ही आघाडींवर सारख्याच प्रमाणात लक्ष देता येणे शक्य नसते. बऱ्याचदा त्यांची शैक्षणिक क्षेत्राट पिछेहाट होते त्यामुळे नोकरी,व्यवसायाच्या स्पर्धेत ते अन्य विद्यार्थ्यांशी स्पर्धा करु शकत नाहीत. ही बाब विचारात घेऊन शासनाने, अत्युच्च गुणवत्ताधारक खेळाडूंना संदर्भाधीन दि.०१ जुलै,२०१६ च्या शासन निर्णयान्वये नोकरीसाठी ५ टक्के आरक्षण ठेवण्याचा निर्णय घेतला आहे. तथापि, खेळाडू आरक्षण हा शासकीय सेवेत प्रवेश करण्याचा सोपा मार्ग असल्याचे मानून, बरेच उमेदवार बोगस क्रीडा प्रमाणपत्र धारण करतात. आणि त्या आधारे शासन सेवेत प्रवेश करतात. ही बाब खऱ्या खेळाडू उमेदवारांवर अन्याय करणारी आहे.

बोगस क्रीडा प्रमाणपत्र प्राप्त करुन घेण्यासाठी, संबंधित उमेदवार काहीवेळा गैरव्यवहार करीत असल्याचे आढळून येते. कालांतराने, बोगस खेळाडू प्रमाणपत्राच्या अनुषंगाने शासनाकडे, दाखल होणाऱ्या तक्रारींच्या अनुषंग़ाने केल्या जाणाऱ्या चौकशीत असे उमेदवार दोषी आढळतात. शासनाकडून अशा बोगस खेळाडू उमेदवारांविरुद्ध फ़ौजदारी कारवाई करण्यात येते. किंबहुना अशा उमेदवारांना शासनातून बडतर्फ़ करावे लागते, त्यामुळे संबंधित उमेदवारांना मोठ्या सामाजिक अवहेलनेला ही सामोरे जावे लागते. तसेच ज्या उमेदवारांकडे बोगस क्रीडा प्रमाणपत्र आहे मात्र अद्याप शासन सेवेत नियुक्ती झाली नाही, अशा उमेदवारांवर देखील आयुष्यभर कारवाईची टांगती तलवार असते. त्यामुळे सामाजिक आणि आर्थिक नुकसान झालेले युवा उमेदवार आयुष्याची निश्चीत दिशा ठरवू शकत नाहीत.

सदरची बाब विचारात घेऊन, सद्यस्थितीत बोगस खेळाडू उमेदवारांविरुद्ध शासनामार्फ़त करण्यात येत असलेल्या कारवाईंमुळे, अनावधानाने/भुलथापांना बळी पडलेल्या बोगस खेळाडू प्रमाणपत्रधारक युवा ***उमेदवारांचे भवितव्य अडचणीत येऊ नये*** यासाठी त्यांना एक संधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय-</u>**

बोगस खेळाडू प्रमाणपत्रधारक युवा उमेदवारांचे संपूर्ण भवितव्य अडचणीत येऊ नये यासाठी, अशा उमेदवारांना एक संधी देण्याच्या उद्देशाने ***"बोगस क्रीडा प्रमाणपत्र,बोगस क्रीडा प्रमाणपत्र पडताळणी अहवाल समर्पण योजना"*** खालील प्रमाणे राबविण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

१. ***<u>योजनेची उद्दिष्ट्ये-</u>***

बोगस क्रीडा प्रमाणपत्र/बोगस क्रीडा प्रमाणपत्र पडताळणी अहवाल समर्पण योजनेचे उद्दिष्ट्ये खालीलप्रमाणे आहेत-

I. बोगस खेळाडू उमेदवारांनी धारण केलेली बोगस क्रीडा प्रमाणपत्रे/बोगस क्रीडा प्रमाणपत्र पडताळणी अहवाल शासनाकडे जमा करुन घेणे.

II. बोगस खेळाडू प्रमाणपत्राआधारे दावा करणाऱ्या उमेदवारांचा शासन सेवेतील प्रवेश प्रतिबंधित करणे व वैध क्रीडा प्रमाणपत्र धारक खेळाडूंना, आरक्षणाच्या पदासाठी संधी उपलब्ध करुन देणे.

III. समर्पण योजनेत सहभागी होणाऱ्या युवा उमेदवारांना पुढील काळात कायद्याचे पालन करणारे जबाबदार नागरिक म्हणून जीवन जगण्यास प्रवृत्त करणे.

२. ***<u>योजनेचे स्वरुप-</u>***

बोगस क्रीडा प्रमाणपत्र/बोगस क्रीडा प्रमाणपत्र पडताळणी अहवाल समर्पण योजनेत खालील बाबींचा समावेश असेल-

*I.* ***<u>शासन सेवेत नियुक्त/निवड न झालेल्या मात्र बोगस खेळाडू प्रमाणपत्र आणि बोगस प्रमाणपत्र पडताळणी अहवालधारक खेळाडूच्या प्रकरणी योजनेचे स्वरुप-</u>***

उपरोक्त प्रमाणे बोगस खेळाडू प्रमाणपत्रे धारण करणाऱ्या खेळाडूंनी सदरची ***मूळ क्रीडा प्रमाणपत्रे व क्रीडा पडताळणी अहवाल*** ,आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांच्याकडे दि.३१ मे,२०२२ पुर्वी समर्पित करावित. सदर मुदतीत अशी बोगस प्रमाणपत्रे जमा करणाऱ्या कोणत्याही उमेदवारास, यासंदर्भात, शासनाच्या अधिपत्याखालील कोणत्याही कार्यालयातून अतिरीक्त विचारणा केली जाणार नाही अथवा त्यास कोणत्याही चौकशीस सामोरे जावे लागणार नाही. सदर उमेदवारांविरुद्ध कोणतीही फ़ौजदारी कारवाई करण्यात येणार नाही. तसेच क्रीडा प्रमाणपत्र, क्रीडा प्रमाणपत्र पडताळणी अहवाल जमा करणाऱ्या उमेदवारांच्या नावाची गोपनीयता बाळगण्यात येईल, याबाबतची जबाबदारी आयुक्त, क्रीडा व युवक सेवा संचालनालय स्तरावर राहील.

*II.* ***<u>कारवाईसाठीची प्रकरणे-</u>***

शासनाने उपरोक्त प्रमाणे दिलेल्या मुदतीत बोगस क्रीडा प्रमाणपत्राबाबतचा मूळ दस्ताऐवज शासनाकडे जमा न करणाऱ्या, बोगस प्रमाणपत्र धारक सर्व उमेदवारांची

सखोल चौकशी करुन त्यांच्याविरुद्ध आणि त्यांना बोगस प्रमाणपत्र वितरीत करणाऱ्या संबंधित खेळाच्या संघटनेविरुद्ध नियमानुसार कडक फ़ौजदारी कारवाई करण्यात येईल.

३.*कार्यपद्धती-*

बोगस क्रीडा प्रमाणपत्र/बोगस क्रीडा प्रमाणपत्र पडताळणी अहवाल समर्पण योजनेत खालील बाबींचा समावेश असेल-

I. बोगस क्रीडा प्रमाणपत्र/बोगस क्रीडा प्रमाणपत्र धारक उमेदवारांनी त्यांची सदरची *मूळ क्रीडा प्रमाणपत्रे व क्रीडा पडताळणी अहवाल*, आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांच्या नावे पत्राद्वारे/ व्यक्तिशः उपस्थित राहून जमा करावीत.

II. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांनी सदरचे क्रीडा प्रमाणपत्र पडताळणी अहवाल रद्द करण्याची कार्यवाही करावी.

III. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांनी दि.३१ मे,२०२२ पुर्वी बोगस क्रीडा प्रमाणपत्राबाबतचा मूळ दस्ताऐवज शासनाकडे जमा न करणाऱ्या, बोगस प्रमाणपत्र धारक सर्व उमेदवारांची सखोल चौकशी करुन त्यांच्याविरुद्ध आणि त्यांना बोगस प्रमाणपत्र वितरीत करणाऱ्या संबंधित खेळाच्या संघटनेविरुद्ध नियमानुसार कडक फ़ौजदारी कारवाई करावी.

*४.प्रसिद्धी-*

सदर बोगस क्रीडा प्रमाणपत्र/बोगस क्रीडा प्रमाणपत्र पडताळणी अहवाल समर्पण योजना यशस्वी होण्याच्या दृष्टीने,आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, सर्व उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा व सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी यांनी व्यापक स्तरावर प्रसिद्धी द्यावी.

सदर योजना या शासन आदेशांच्या दिनांकापासून अंमलात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२२०२२३१६०८५२६५२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swati Madhukar Nanal

Digitally signed by Swati Madhukar Nanal
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=82e1d6f07c5cabf5884958ee70015d36b35b2c07e9700fe62cba2439a81b4be4, serialNumber=007d84f8ce44beba86b0ca2d0155d67cc1a9db4f8d59bc9d8067628d62bcdc1a, cn=Swati Madhukar Nanal
Date: 2022.02.23 16:11:52 +05'30'

**(स्वा.म.नानल)**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य

२. मा.मंत्री, क्रीडा व युवक कल्याण यांचे विशेष कार्य अधिकारी,मंत्रालय, मुंबई

३. मा. विरोधी पक्षनेता (विधानसभा/विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक,मुंबई

४. मा. राज्यमंत्री, क्रीडा व युवक कल्याण यांचे विशेष कार्य अधिकारी,मंत्रालय,
५. सर्व विधानसभा/विधानपरिषद सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
७. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,मंत्रालय, मुंबई
८. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
९. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई
१०. लोकायुक्त, महाराष्ट्र, नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालयासमोर,मुंबई
११. आयुक्त, क्रीडा व युवकसेवा,महाराष्ट्र राज्य,पुणे
१२. सर्व मंत्रालयीन विभाग
१३. सर्व मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील कार्यालय प्रमुख/विभाग प्रमुख
१४. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
१५. सर्व शिक्षणाधिकारी, जिल्हा परिषद
१६. सर्व उपसंचालक, क्रीडा व युवकसेवा, महाराष्ट्र राज्य
१७. सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी
१८. महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मंत्रालय,मुंबई
१९. कक्ष अधिकारी (क्रीयुसे-१/३), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,मंत्रालय, मुंबई
२०. निवड नस्ती, क्रीयुसे-२.